**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत बंद असलेल्या प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजना पुनरुज्जीवित करण्याबाबतच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१६/प्र.क्र.९०/पापु-१९**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीखः ३१ डिसेंबर, २०१६

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दिनांक १७ मार्च, २०१०
२) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१३
३) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१५६/पापु-०७, दिनांक २२ जानेवारी, २०१४
४) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै, २०१४
५) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४
६) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक १६ फ़ेब्रुवारी, २०१५
७) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दिनांक २० फ़ेब्रुवारी, २०१५
८) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १० मार्च, २०१५
९) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५ जून, २०१५
१०) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
११) शासन निर्णय क्रमांक: ग्रापापु-२११६/प्र.क्र.३९/पापु-१९, दिनांक २३ सप्टेंबर, २०१६

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन क्र.१० येथील दि.०७ मे, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर कार्यक्रमांतर्गत सद्य:स्थितीत बंद असलेल्या व पुनरुज्जीवित करणे गरजेचे असलेल्या ०८ प्रादेशिक ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांच्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांचे अध्यक्षतेखालील तांत्रिक समितीच्या दि.२३ नोव्हेंबर, २०१६ रोजीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार सदर ०८ योजनांच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-१ मधील सद्य:स्थितीत बंद असलेल्या व पुनरुज्जीवित करणे आवश्यक असलेल्या ०८ प्रादेशिक ग्रामीण नळ पाणीपुरवठा योजनांच्या एकूण रु.८६५.६३ लक्ष (अक्षरी रुपये आठ कोटी पासष्ट लक्ष त्रेसष्ट हजार फ़क्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत खालील अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

I. सदर योजनांच्या पुनरुज्जीवनाची, पुढील देखभाल दुरुस्तीची, संचलन व सनियंत्रणाची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहील.

II. योजनेची कामे विहीत पध्दतीने ई- निविदा मागविण्यात येऊन करावीत. जादा किंमतीच्या निविदा स्वीकृत करु नयेत. योजनेचे काम प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीमध्येच पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. योजनेची किंमत वाढल्यास त्याला राज्य शासन जबाबदार राहणार नाही.

III. योजनेचा उद्भव विकसित झाल्याशिवाय इतर कामे सुरु करु नयेत. उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.

IV. पाणीपुरवठा करण्यासाठी प्रत्येक गावाकरिता स्वतंत्र व्यवस्था करावी, जेणेकरुन पाणीपट्टीची रक्कम न भरल्यामुळे एखाद्या गावाचा पाणीपुरवठा बंद करावयाचा झाल्यास कोणतीही अडचण येणार नाही.

V. योजना चालविणे व देखभाल दुरूस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधित ग्रामपंचायतीने योजनेच्या अंमलबजावणीसाठी प्रस्तावामध्ये नमूद केल्यानुसार घरगुती, बिगर घरगुती व संस्थात्मक नळ धारकासाठी पाणी पट्टीचा दर निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करण्यात यावी.

VI. योजना चालविणे त्याचे परिरक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस/महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

VII. योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळ जोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

VIII. कोणत्याही कारणाने खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

IX. सदर योजनांच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची पुर्तता करण्यात यावी. तसेच संदर्भाधीन क्र.१० येथील दि.०७ मे, २०१६ च्या शासन निर्णयातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

X. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी निश्चित करणे व त्यात आवश्यकतेनुसार वाढ करणे ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील. याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना स्पष्टपणे सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेचे पुनरुज्जीवन हाती घेण्यात यावे.

XI. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.

XII. योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेच्या पुर्णत्वाचे दाखले संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून प्राप्त करुन घेवून शासनास सादर करण्याची जबाबदारी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो), बेलापूर यांची राहील.

२. सदर योजनांवर होणारा खर्च मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२७) बंद पडलेल्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांचे पुनरुज्जीवन (२२१५ ९९५१)- ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२३११४४५३४३५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2016.12.31 16:22:48 +05'30'

**(रा. अ. साबणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
४) विभागीय आयुक्त, नागपूर/औरंगाबाद/अमरावती.
५) जिल्हाधिकारी, भंडारा/गोंदिया/वाशिम/परभणी/हिंगोली.
६) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.

७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा/ गोंदिया/वाशिम/परभणी/हिंगोली.
८) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
९) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर/औरंगाबाद.
११) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१२) कार्यासन पापु-०४, पापु-१३, पापु-१८ व पापु-२० पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय
१३) निवड नस्ती पापु-१९

(शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१६/प्र.क्र.९०/पापु-१९, दि.३१ डिसेंबर, २०१६ सोबतचे परिशिष्ट)

## परिशिष्ट-१

| अ.क्र. | योजनेचे नाव | जिल्हा | ढोबळ किंमत (रु.लक्ष) |
|---|---|---|---|
| १ | मौ. पुतळी (ता.सडक अर्जुनी) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | गोंदिया | ६०.५९ |
| २ | मौ. देव्हाडी (ता .तुमसर) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | भंडारा | ६९.५५ |
| ३ | मौ. तिखाडी गाडीबोरी - ८ गांवे (ता. हिंगोली) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | हिंगोली | ४६.६९ |
| ४ | मौ. वस्सा-१२ गांवे (ता.जिंतूर) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | परभणी | १५७.०९ |
| ५ | मौ. करडा-२ गांवे (ता .रिसोड) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | वाशिम | ६८.२१ |
| ६ | मौ. उंबर्डा बाजार-९ गांवे (ता.कारंजा) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | वाशिम | १९०.८१ |
| ७ | मौ. म्हसणी-१६ गांवे (ता.मानोरा) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | वाशिम | १९०.८० |
| ८ | मौ. वारला-४ गांवे (ता.रिसोड) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजना | वाशिम | ८१.८९ |
| | **एकुण** | | **८६५.६३** |

****************